**थोर स्वातंत्र्य सेनानी तात्या टोपे यांच्या २०० व्या जयंतीदिनानिमित्त येवला येथे उभारावयाच्या स्मारकाच्या बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण ८२१५/प्र. क्र. १२८/सां.का.४**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक : १९ नोव्हेंबर, २०१८**

**वाचा :- १)** भारत सरकार, सांस्कृतिक मंत्रालय यांचे पत्र क्र. एफ.१३-१/२१५-स्पेशल सेल, दिनांक २२ जून, २०१६
२) मुख्याधिकारी, येवले नगर परिषद, येवले यांचे पत्र क्र. ४८८/१८, दिनांक २६ मार्च, २०१८

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाच्या सांस्कृतिक कार्य मंत्रालयाच्या "Centenary & Anniversaries Celebration" या योजनेअंतर्गत थोर स्वातंत्र्य सेनानी तात्या टोपे यांच्या २०० व्या जयंतीनिमित्त येवला, नाशिक येथे स्मारक बांधण्याकरिता केंद्र शासनाने त्यांचा ७५% हिस्सा रुपये ७.८८ कोटी मंजूर केला आहे. सदर स्मारकाच्या बांधकामासाठी राज्य शासनाचा १५% व नगर पालिका, येवला, नाशिक यांचा १०% व अधिक होणरा खर्च हिस्सा असणार आहे. सदर बांधकामाच्या खर्चास प्रशासकीय मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

या शासन निर्णयान्वये येवला नगर परिषदेच्या हद्दीतील सर्व्हे नं. ४९, ५० ( बाभूळगांव खु.) येथे थोर स्वातंत्र्य सेनानी तात्या टोपे यांच्या स्मरणार्थ स्मारक बांधण्यासाठी रुपये १०,९२,२९,०००/- (रुपये दहा कोटी ब्याण्णव लक्ष एकोणतीस हजार फक्त ) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास व आराखडयांना खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१. काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.
२. प्रस्तुत काम पुरातत्व विभागाच्या अखत्यारित येत असल्यास संबंधीत विभागाची तसेच महानगरपालिका व तत्सम प्राधिकरणे यांची पूर्व परवानगी घ्यावी.
३. सदर कामाकरिता वारंवारितेनुसार साहित्याच्या आवश्यक सर्व चाचण्या करुन घेणेबाबत खबरदारी घ्यावी.
४. मंजूर राज्य दरसूचीबाहय बाबींच्या दराकरिता शासन परिपत्रक क्रमांक - २०१७/ प्र.क्र.११/ नियोजन-३, दिनांक ११ एप्रिल, २०१७ नुसार कार्यवाही करण्यात यावी.
५. प्रस्तावातील खरेदीशी संबंधित बाबींकरिता ई-निविदा प्रणालीचा अवलंब करुन उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाकडील दिनांक १ डिसेंबर, २०१६ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित केलेल्या सूचना विचारात घ्याव्यात.

६. प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/ तां.क.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.
७. स्थापत्य कामाच्या कालावधीतच विद्युतीकरणाबाबत योग्य नियोजन करुन विद्युतीकरणाचे काम पूर्ण करावे.
८. इमारतीमध्ये दिव्यांगाकरिता उपलब्ध करुन द्यावयाच्या विविध सोयींबाबत शासनाने वेळोवेळी दिलेल्या सूचनांच्या अनुषंगाने कार्यवाही करण्यात यावी.
९. विषयांकित कामांकरिता सुधारीत प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही. याद्दष्टीने विशेष दक्षता घेऊन काम करण्यात यावे.
१०. सदर कामाच्या नकाशांस नगर रचना व दिनांक ८ डिसेंबर, २०१७ च्या शासन निर्णयातील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात आली आहे. यास्तव काम करताना सदर अटी विचारात घेऊन काम करणे अभिप्रेत आहे.
११. मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, नाशिक यांनी दिनांक ६ मार्च, २०१८ अन्वये तांत्रिक मंजूरी दिलेल्या आदेशामधील अटींचे पालन करावे.

२. सदर स्मारकाच्या बांधकामाकरिता एकूण खर्च रु.१०,९२,२९,०००/- इतका अंदाजित करण्यात आला आहे. परंतु केंद्र शासनाने सदर प्रकल्पावर एकूण रु. १०.५० कोटी खर्च करण्यास मंजूरी दिली आहे. यापैकी ७५% म्हणजेच रु. ७.८८ कोटी केंद्र शासनाचा हिस्सा व १५% म्हणजे रु. १,५७,५०,०००/- राज्य शासनाचा राहणार आहे व उर्वरित खर्च रु. १,४६,७९,०००/- नगर परिषद, येवला, नाशिक यांनी करावयाचा आहे.

३. राज्य शासनाच्या हिश्यापोटी येणारा खर्च मागणी क्र. झेडडी-२, २२०५ कला व संस्कृती (००) १०२, कला व संस्कृती प्रचालन (०१) (०२) शासकीय प्रेक्षागृहे व सभागृहे (२२०५ १४८१) ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखालील संबंधित आर्थिक वर्षासाठीच्या मंजूर अर्थसंकल्पिय तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय विअप्र -२०१३/ प्र.क्र.३०/ २०१३/ विनियम, भाग २, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला उपविभाग तीन मधील अनुक्रमांक ४ मधील परिच्छेद क्र. २७ (२) "अ" नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकाराच्या अधिन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १७०/१४४३, दिनांक २८ सप्टेंबर, २०१८ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २७०/२०१८/व्यय-१५, दिनांक १७ ऑक्टोबर, २०१८ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१११९१०५६१८७७२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shailesh Tukaram Jadhav

Digitally signed by Shailesh Tukaram Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tourism And Cultural Affairs Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2f28af075ed91b64d12528e9ab00bb144f43fcf33c23ccf14c820b969f8ca273, serialNumber=a90555ec4a073187eb44ee0b1aa93e5c855afff34eedb4b03bb3e0a6cfd6271c, cn=Shailesh Tukaram Jadhav
Date: 2018.11.19 13:18:32 +05'30'

**( शैलेश तु. जाधव )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र- १/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
२. मुख्याधिकारी, येवले नगर परिषद, येवले, नाशिक
३. कक्ष अधिकारी (कार्या.१४४३), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
४. कक्ष अधिकारी (व्यय-१५), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक
६. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
७. कक्ष अधिकारी (सां.का.१), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
८. निवड नस्ती, सां.का.४